cr 1542

जिल्हा ग्रामीण विकास यंत्रणेकडील सरळसेवा नियुक्त वर्ग-३ व वर्ग-४ च्या कर्मचा-यांचे जिल्हा परिषदेच्या समुचित संवर्गातील विद्यमान पदांवर हस्तांतरण.

महाराष्ट्र शासन
ग्राम विकास व जलसंधारण विभाग,
शासन निर्णय क्र.आयआरडी १०९८/प्र.क्र.१५४२/४५
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२, दिनांक: २१ ऑक्टोबर २०००.

प्रस्तावना:-

जिल्हा ग्रामीण विकास यंत्रणेकडील सरळसेवा नियुक्त कर्मचा-यांना महाराष्ट्र नागरी सेवा नियम (पेन्शन व ग्रुच्युईटी वगळून) लागू करण्यात आले आहेत. जिल्हा ग्रामीण विकास यंत्रणेच्या कर्मचा-यांच्या संघटनेने पेन्शन व ग्रॅच्युईटी लागू करण्याबाबत वारंवार निवेदने सादर केलेली आहेत. तथापि पेन्शन व ग्रॅच्युईटी मिळण्याबाबतची संघटनेची मागणी पूर्ण होऊ शकली नाही. जिल्हा ग्रामीण विकास यंत्रणेच्या सरळसेवा नियुक्त वर्ग-३ व वर्ग-४ च्या कर्मचा-यांना जिल्हा परिषदांमध्ये समकक्ष पदांवर हस्तांतरीत करुन सामावून घेण्याचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधिन होता. जिल्हा ग्रामीण विकास यंत्रणेच्या आस्थापनाविषयक प्रलंबित सर्व बाबी लक्षात घेऊन जिल्हा ग्रामीण विकास यंत्रणेचे बळकटीकरण करण्याच्या उद्देशाने जिल्हा ग्रामीण विकास यंत्रणेकडील कर्मचा-यांसाठी नवीन आकृतिबंध विहित करणे, पदांची मानके निश्चित करणे आणि इतर धोरण निश्चित करणे इत्यादी बाबत कार्यवाही करण्यासाठी सहसचिव ग्राम विकास व जलसंधारण विभाग यांच्या अध्यक्षतेखाली दिनांक २६ मे १९९८ च्या शासन निर्णयान्वये समितीची स्थापना करण्यात आली. जिल्हा ग्रामीण विकास यंत्रणेकडील कर्मचा-यांचा स्वतंत्र संवर्ग निर्माण करावा किंवा त्यांना जिल्हा परिषदेमध्ये विलीन करावे या बाबत समितीने सखोल विचार केला आणि दोन्ही मुद्दयांच्या गुण व दोषाबद्दल विचार केल्यानंतर जिल्हा ग्रामीण विकास यंत्रणेकडील जे कर्मचारी सध्या सेवा करतात त्यांना जिल्हा परिषदेमध्ये विलीन करणे योग्य आहे असा निष्कर्ष समितीने एकमताने काढला आहे.

**शासन निर्णय:-** या सर्व बाबींचा विचार करुन शासनाने आता जिल्हा ग्रामीण विकास यंत्रणेच्या सरळसेवा नियुक्त वर्ग-३ व वर्ग-४ च्या कर्मचा-यांना जिल्हा परिषदेतील समुचित संवर्गातील विद्यमान पदांवर हस्तांतरण करण्याचा निर्णय घेतला आहे. या अनुषंगाने महाराष्ट्र जिल्हा परिषदा व पंचायत समित्या अधिनियम १९६१ चे कलम २४२ मध्ये तरतूद करण्यात आली असून याबाबत २४२ ड या कलमाचा समावेश करण्यात आला आहे. याबाबतचा सन २००० चा महाराष्ट्र अधिनियम क्र.३४ महाराष्ट्र शासन राजपत्र असाधारण, दिनांक ५ ऑगस्ट २००० मध्ये प्रकाशित झाला आहे. सदर राजपत्राच्या प्रती या विभागाचे पृष्ठांकन क्र. झेडपीए १०९७/ प्र.क्र.२६१/ ०५, दिनांक २३ ऑगस्ट २००० अन्वये मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद तथा अध्यक्ष जिल्हा ग्रामीण विकास यंत्रणा (सर्व) यांना पाठविल्या आहेत.

महाराष्ट्र जिल्हा परिषदा व पंचायत समित्या अधिनियम १९६१ कलम २४२ ड मधील तरतुदीनुसार जिल्हा ग्रामीण विकास यंत्रणेकडील सरळसेवा नियुक्त वर्ग-३ व वर्ग-४ चे कर्मचारी जिल्हा परिषदेतील समुचित संवर्गातील विद्यमान पदांवर खालील अटीं व शर्ती यांच्या अधिन राहुन हस्तांतरीत होतील आणि त्या दिनांकापासून (निरनिराळया कर्मचा-यासाठी जो वेगवेगळा असू शकेल) ते संबधित जिल्हा परिषदेचे कर्मचारी होतील.

GR-200020123164651000-1200

१) जिल्हा ग्रामीण विकास यंत्रणांकडून ज्यांची थेट नियुक्ती करण्यात आली आहे अशा जिल्हा ग्रामीण विकास यंत्रणेच्या वर्ग-३ व वर्ग-४ च्या कर्मचा-यांच्या सेवा जिल्हा परिषदांकडे हस्तांतरीत करण्यात येतील त्या दिनांकापासून संबंधित जिल्हा परिषदेकडे, जिल्हा परिषदेच्या समुचित संवर्गामधील विद्यमान पदांवर हस्तांतरीत होतील आणि त्या दिनांकापासून ते संबंधित जिल्हा परिषदेचे कर्मचारी होतील. जिल्हा ग्रामीण विकास यंत्रणमधील पदाचा जिल्हा परिषदेमधील समकक्ष पदांची माहिती सोबतच्या परिशिष्ठात दिली आहे.

२) अशा रितीने हस्तांतरीत झालेला जिल्हा ग्रामीण विकास यंत्रणेचा प्रत्येक कर्मचारी हस्तांतरणाच्या दिनांकापासून, संबंधित जिल्हा परिषदेच्या आस्थापनेच्या समुचित संवर्गातील विद्यमान पदावर त्या जिल्हा परिषदेचा कर्मचारी होईल आणि वेतन, भत्ते, रजा, बदली, सेवानिवृत्ती, निवृत्तीवेतन, भविष्य निर्वाह निधी या संबंधातील अशा कर्मचा-याच्या सेवेच्या अटी व शर्ती आणि इतर सेवाशर्ती यांचे, जिल्हा परिषद सेवांच्या समुचित संवर्गाच्या सदस्यांच्या सेवाशर्तीचे ज्यांव्दारे विनियमन होते त्या नियमांव्दारे व आदेशांव्दारे विनियमन करण्यात येईल.

३) जिल्हा परिषदांकडे अशा प्रकारे हस्तांतरीत करण्यात आलेला कोणताही कर्मचारी, हस्तांतरणाच्या दिनांकास जिल्हा परिषद सेवेच्या समुचित संवर्गामध्ये सर्वात कनिष्ठ असल्याचे समजण्यात येईल.

४) जिल्हा परिषदांकडे अशा प्रकारे हस्तांतरीत करण्यात आलेला कोणताही कर्मचारी महाराष्ट्र जिल्हा परिषदा व पंचायत समित्या अधिनियम१९६१चे२४२ ड कलम अस्तित्वात आले नसते तर तो हस्तांतरणाच्या दिनांकास ज्या पदावधी पर्यंत, ज्या परिश्रमिकावर आणि सेवेच्या ज्या इतर शर्तीवर ज्या हक्कांसह व विशेषाधिकारांसह त्याने ते पद धारण केले असते त्याच पदावधी पर्यंत, त्याच परिश्रमिकावर आणि सेवेच्या इतर शर्तीवर त्याच हक्कांसह व विशेषाधिकारांसह त्याने ते पद धारण केले असते त्याच पदावधीपर्यंत,त्याच परिश्रमिकावर आणि सेवेच्या इतर शर्तीवर त्याच हक्कांसह व विशेषाधिकारांसह संबंधित जिल्हा परिषदेच्या नियंत्रणाखालील त्याचे पद धारण करील. जिल्हा ग्रामिण विकास यंत्रणेच्या नियंत्रणाखाली त्याने केलेली कोणतीही सेवा ही, संबंधित जिल्हा परिषदेच्या समुचित संवर्गातील जेष्ठतेच्या प्रयोजनासाठी नव्हे तर केवळ निवृत्ती वेतन व उपदान या प्रयोजनांसाठी जिल्हा परिषदेच्या नियंत्रणाखाली करण्यात आलेली सेवा असल्याचे मानण्यात येईल. तो, संबंधित जिल्हा परिषदेच्या नियंत्रणाखालील त्याची नोकरी रितसर समाप्त केली जाईपर्यंत किंवा त्याच्या सेवेच्या शर्तीचे ज्याव्दारे त्यावेळी नियमन केले जात असेल त्या कायदयानुसार किंवा जिल्हा परिषदेकडून त्याच्या परिश्रमिकात किंवा सेवेच्या इतर शर्तीत यथोचित रित्या सुधारणा किंवा फेरफार केले जाईपर्यंत जिल्हा परिषदेच्या सेवेत असण्याचे चालू राहील.

परंतु, हस्तांतरणाच्या दिनांकाच्या लगतपूर्वी कोणत्याही अशा कर्मचा-यांच्या बाबतीत लागू असलेल्या सेवेच्या शर्तीमध्ये, राज्य शासनाच्या पूर्व मान्यतेने असेल त्याव्यतिरिक्त, त्यास अहितकारक ठरेल अशा रितीने फेरबदल करण्यात येणार नाही.

५) जिल्हा ग्रामीण विकास यंत्रणेतील कर्मचा-यांना जिल्हा परिषदेच्या समुचित संवर्गातील विद्यमान पदांवर हस्तांतरीत करून जिल्हा परिषदंमध्ये सामावून घ्यावयाचे असल्याने अशा हस्तांतरणासाठी कोणतेही नवीन पदे निर्माण करण्यात येणार नाहीत. जिल्हा परिषदेमध्ये आहेत त्याच रिक्त पदांवर त्यांना सामावून घेताना जिल्हा परिषदांमधील रिक्त पदे भरण्या संदर्भात शासनाच्या प्रचलित आदेशांनुसार कार्यवाही करावी. सदर कर्मचारी जिल्हा परिषदेत ज्या तारखेस जातील त्या तारखेपासून त्यांचे जिल्हा परिषदेमध्ये विलिनीकरण होईल. जिल्हा ग्रामीण विकास यंत्रणेच्या कर्मचा-यांचे विलिनीकरण हे जिल्हा परिषदेमध्ये एकाच वेळेस होणे कदाचित शक्य होणार नाही. कारण यासाठी नविन पदे निर्माण करण्याचे प्रस्तावित नसून जिल्हा परिषदेमध्ये प्रचलित रिक्त असलेल्या पदावर हया कर्मचा-यांना सामावून

GR-200201231646510000-1200

घ्यावयाचे आहे. त्यामुळे जेव्हा जेव्हा पदं जिल्हा परिषदेमध्ये रिक्त होतील त्यावेळेस हे कर्मचारी जिल्हा परिषदेमध्ये हस्तांतरीत होतील.

६) जिल्हा ग्रामीण विकास यंत्रणेच्या कोणत्याही कर्मचा-यांची सेवा अशाप्रकारे जिल्हा परिषदेकडे हस्तांतरीत करण्यात आल्यास अशा हस्तांतरणानंतर जिल्हा परिषद, असा कर्मचारी जिल्हा ग्रामीण विकास यंत्रणेच्या सेवेत असताना त्याची कोणतीही कृती किंवा अकृती किंवा वर्तणूक किंवा अभिलेख नोंद या संबंधात त्याच्या विरुध्द किंवा संबंधात योग्य वाटेल अशी शिस्तभंगाची किंवा अन्य कारवाई करण्यास जिल्हा परिषद सक्षम असेल.

७) जिल्हा ग्रामिण विकास यंत्रणेचे कर्मचारी जिल्हा परिषदेमध्ये हस्तांतरीत झाल्यानंतर जिल्हा ग्रामीण विकास यंत्रणेमध्ये जी पदे रिक्त होतील त्या पदावर जिल्हा परिषदेतील कर्मचा-यांना प्रतिनियुक्तीने, प्रतिनियुक्ती भत्त्याशिवाय पाठविण्यात येईल.

जिल्हा ग्रामीण विकास यंत्रणेच्या कर्मचा-यांना अंशदायी भविष्य निर्वाह निधी योजना लागू आहे. त्यांच्या अंशदायी भविष्यनिर्वाहनिधीच्या हस्तांतरणाबाबत व त्यांना सर्वसाधारण भविष्यनिर्वाह निधी लागू करण्याबाबतचे आदेश वेगळयाने निर्गमित करण्यात येत आहेत.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने.

(बिपिनकुमार)
उप सचिव, महाराष्ट्र शासन

प्रत,

१. विभागीय आयुक्त (सर्व)
२.मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद (सर्व)
३.मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद तथा अध्यक्ष जिल्हा ग्रामीण विकास यंत्रणा (सर्व)
४. प्रकल्प संचालक, जिल्हा ग्रामीण विकास यंत्रणा (सर्व)
५. कार्यासन क्र.१३, जल-२०, ग्राम विकास व जलसंधारण विभाग.
६. निवड नस्ती का.क्र.४५

**शासन निर्णय क्रमांक आयआरडी १०९८/प्र.क्र.१५४२/४५, दिनांक २१ ऑक्टोबर २००० चे परिशिष्ट**

जिल्हा ग्रामीण विकास यंत्रणेतील पदांची जिल्हा परिषदेतील समकक्ष पदे

| अ.क्र. | जिल्हा ग्रामीण विकास यंत्रणेतील पद | वेतन श्रेणी | जिल्हा परिषदेतील समकक्ष पदाचे नांव | वेतनश्रेणी |
|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ |
| १ | सांख्यिकी सहाय्यक | १२००-२०४० | वरिष्ठ सहाय्यक (सांख्यिकी) | १२००-२०४० |
| २ | वरिष्ठ लेखा लिपीक | १२००-२०४० | वरिष्ठ सहाय्यक (लेखा) | १२००-२०४० |
| ३ | कार्यालयीन अधिक्षक | १६४०-२९०० | कक्ष अधिकारी | १६४०-२९०० |
| | अन्वेषक | १२००-२०४० | वरिष्ठ सहाय्यक (सांख्यिकी)* | १२००-२०४० |
| ५ | लघुटंकलेखक | १२००-२०४० | लघु टंकलेखक | १२००-२०४० |
| ६ | उच्चश्रेणी लघुलेखक | २०००-३२०० | उच्चश्रेणी लघुलेखक | २०००-३२०० |
| ७ | कनिष्ठ लिपीक | ९५०-१५०० | कनिष्ठ सहाय्यक | ९५०-१५०० |
| ८ | वाहन चालक | ९५०-१५०० | वाहन चालक | ९५०-१५०० |
| ९ | शिपाई | ७५०-९४० | परिचर | ७५०-९४० |
| १० | रखवालदार | ७५०-९४० | चौकीदार | ७७५-११५० |
| ११ | उपलेखापाल | १४००-२६०० | उप लेखापाल | १४००-२६०० |
| १२ | ग्रामसेविका | ९७५-१५४० | ग्रामसेविका | ९७५-१५४० |
| १३ | संशोधन सहाय्यक | १६४०-२९०० | विस्तार अधिकारी (सांख्यिकी) | १६४०-२९०० |
| १४ | वरिष्ठ लिपीक | १२००-२०४० | वरिष्ठ सहाय्यक | १२००-२०४० |

* जिल्हा परिषदेत अन्वेषक हे पद नाही परंतु त्या वेतनश्रेणीतील जिल्हा परिषदेतील वरिष्ठ सहाय्यक (सांख्यिकी) या पदी सामावून घेता येईल.

GR-20020123164651000-1200